**अपर निबंधक, सहकारी संस्था संवर्गातील अधिका-यांना अपर आयुक्त व विशेष निबंधक, सहकारी संस्था या संवर्गात पदोन्नती व पदस्थापना देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : राजस २०१५/प्र.क्र.१२६/५-स**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख : १४ मार्च, २०१७

**शासन निर्णय :-**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील श्री.एस.के.सोनी, अपर निबंधक, सहकारी संस्था यांना अपर आयुक्त व विशेष निबंधक, सहकारी संस्था (गट-अ) या संवर्गात रु. ३७,४००-६७,००० ( ग्रेड पे रुपये ८,८००/-) या वेतनश्रेणीत पदोन्नत करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. उक्त पदोन्नत अधिका-याची अपर आयुक्त व विशेष निबंधक, सहकारी संस्था या संवर्गात पदोन्नतीनंतर खालील प्रमाणे पदस्थापना करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे :-

| अधिका-याचे नांव | सध्याची पदस्थापना | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|
| श्री.एस.के.सोनी | अपर निबंधक, सहकारी संस्था तथा सह व्यवस्थापकिय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई | अपर आयुक्त व विशेष निबंधक, सहकारी संस्था तथा प्रशासक, मुंबई कृषी उत्पन्न बाजार समिती, मुंबई या पदावर करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. या बाबतचे सविस्तर वैधानिक आदेश पणन प्रभागाने निर्गमित करावेत. |

३. उपरोक्त पदोन्नती तदर्थ तत्वावर व मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे प्रलंबित असलेल्या रिट याचिका क्रमांक: २७९७/२०१५ ( स्टॅम्प क्र.७२५६/२०१५) ( महाराष्ट्र राज्य विरुध्द श्री. विजय घोगरे व इतर) तसेच संलग्न इतर न्यायालयीन प्रकरणामध्ये होणा-या अंतिम निर्णयाच्या अधीन राहतील या अटीच्या अधीन पदोन्नती देण्यात येत आहे. त्यानुसार संबंधित अधिका-याने तशा स्वरुपाचे बंधपत्र सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांच्याकडे प्रथम सादर करावे व पदोन्नतीच्या पदावर रुजु व्हावे तसेच त्याबाबतचा अहवाल सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

४. पदोन्नत अधिका-याने पदोन्नतीच्या पदावरील त्यांच्या वेतन निश्चितीसंबंधीचा विकल्प पदोन्नतीच्या दिनांकापासुन १ महिन्याच्या आत द्यावा. असा विकल्प न दिल्यास त्यांची वेतन निश्चिती

महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम १९८१ मधील नियम ११ (१) (एक) खाली पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन केली जाईल.

५. सदर आदेश तात्काळ अमलात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन, त्याचा संकेतांक २०१७०३१४१८२८४४२३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Nitin Gaikwad

Digitally signed by Nitin Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMTD Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5892c3fd8686c1921e784a3faa9888d155b03f5591ce11b21a1b5006247f6972, serialNumber=2276ac762af372d872c2f01d5bb5086166f4a6e20a1bdf9762d556a93f5d118e, cn=Nitin Gaikwad
Date: 2017.03.14 18:29:49 +05'30'

**( नितीन गायकवाड )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

**प्रत :-**

१. श्री.मनोज सौनिक, प्रशासक, मुंबई कृषी उत्पन्न बाजार समिती, मुंबई.
२. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
३. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. प्रधान सचिव (पर्यटन व सांस्कृतीक कार्य)
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई
६. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. संचालक, वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, नागपुर
८. सचिव, मुंबई कृषी उत्पन्न बाजार समिती, मुंबई
९. खाजगी सचिव, मा.मुख्यमंत्री /मा.मंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग)
१०. खाजगी सचिव, मा.राज्यमंत्री (सहकार/पणन /वस्त्रोद्योग)
११. अपर मुख्य सचिव (सहकार /पणन )/ प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक
१२. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (लेखापरीक्षण व प्रशासन)
१३. सर्व प्रादेशिक सहसंचालक (साखर)
१४. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था /सर्व जिल्हा विशेष लेखापरीक्षक, सहकारी संस्था
१५. महालेखापाल, महाराष्ट-१, मुंबई (लेखापरीक्षा / लेखाअनुज्ञेचता)
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१७.निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१८.संबंधित अधिकारी, द्वारा सहकार आयुक्त व निबंधक,सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
१९.सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-१३
२०. सर्व सह सचिव /उप सचिव /अवर सचिव,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग)
२१. निवड नस्ती, कार्यासन ५-स.